**मौजे लहवित, ता. जि. नाशिक येथे नवीन श्रेणी-१ चा पशुवैद्यकीय दवाखाना स्थापन करणे व यासाठी आवश्यक विविध संवर्गातील एकूण ०३ नवीन पदे निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक- संकिर्ण-२०२०/ प्र.क्र. ३३ /पदुम-४**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२**
**दिनांक :- ११ ऑक्टोबर, २०२१.**

**वाचा :**
१) कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचे शासन पूरक पत्र क्र. जिवायो-२०१० / प्र.क्र. २९१ /पदुम-४, दि.०१.०७.२०११.
२) अतिरिक्त आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांचे कार्यालयीन पत्र क्र. व्हीएचडी/३२/१२-१५/२०१५-२०, पसं-१२, पुणे, दि. ०५.०१.२०२१.
३) वित्त विभागाचे पत्र क्र.पदनि-२०२१/प्र.क्र.५२/आपुक, दि.२३.०८.२०२१.
४) वित्त विभाग पृष्ठांकन क्र.पदनि-२०२१/प्र.क्र.५५/२१/आपुक, दि.२३.०९.२०२१ अन्वये मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि.२६.०८.२०२१ रोजी आयोजित उच्च स्तरीय सचिव समितीच्या पार पडलेल्या ६ व्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना -**

शेतकरी / पशुपालक यांच्याकडील पशुधनास पशुवैद्यकीय सेवा उपलब्ध व्हाव्यात म्हणून वाचा क्र.१ येथील दि.०१.०७.२०११ च्या शासन पूरक पत्रान्वये राज्यामध्ये नवीन श्रेणी-१ चा पशुवैद्यकीय दवाखाना स्थापन करण्यासाठीचे विविध निकष निश्चित करण्यात आलेले आहेत. श्रेणी-१ च्या पशुवैद्यकीय दवाखान्याची स्थापना करण्यासाठी पशुधन विकास अधिकारी, गट-अ, ०१ पद, वृणोपचारक, गट-ड, ०१ पद आणि परिचर, गट-ड, ०१ पद अशा एकूण ०३ पदांचा आकृतीबंद देखील मंजूर करण्यात आलेला आहे.

दि.२६.०८.२०२१ रोजी पार पडलेल्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या ६ व्या बैठकीत मौजे लहवित, ता. जि. नाशिक येथे नवीन श्रेणी-१ चा पशुवैद्यकीय दवाखाना स्थापन करण्यासाठी पशुधन विकास अधिकारी, गट-अ, ०१ पद नव्याने निर्माण करण्यास तसेच, वृणोपचारक, गट-ड, ०१ पद आणि परिचर, गट-ड, ०१ पद अशी एकूण ०२ पदांच्या सेवा बाह्यस्रोताद्वारे उपलब्ध करुन घेण्यास देखील समितीने मान्यता प्रदान केलेली आहे. मौजे लहवित, ता. जि. नाशिक येथे नवीन श्रेणी-१ चा पशुवैद्यकीय दवाखाना स्थापन करणे तसेच, सदरच्या स्थापनेसाठी पशुधन विकास अधिकारी, गट-अ चे ०१ पद नव्याने निर्माण करणे आणि वृणोपचारक, गट-ड, ०१ पद आणि परिचर, गट-ड, ०१ पद या ०२ पदांच्या सेवा बाह्यस्रोताद्वारे उपलब्ध करुन घेण्याच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय-**

मौजे लहवित, ता. जि. नाशिक येथे नवीन श्रेणी-१ चा पशुवैद्यकीय दवाखाना स्थापन करण्यास तसेच, सदरच्या स्थापनेसाठी पशुधन विकास अधिकारी, गट-अ चे ०१ पद नव्याने निर्माण करणे आणि वृणोपचारक, गट-ड, ०१ पद आणि परिचर, गट-ड, ०१ पद या ०२ पदांच्या सेवा बाह्यस्रोताद्वारे उपलब्ध करुन घेण्यास याद्वारे, शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

<u>नविन पदनिर्मीतीचा तपशिल</u>

| **अ.क्र.** | **नव्याने निर्माण करावयाच्या पदाचे पदनाम** | **सातव्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी** | **आकृतीबंधाप्रमाणे नव्याने निर्माण करावयाच्या पदाची संख्या** | **शेरा** |
|---|---|---|---|---|
| १ | पशुधन विकास अधिकारी, गट-अ (पशुवैद्यकीय पदवीधर) | एस-२०: (रू.५६१०० - १७७५००/-) | ०१ | नियमित नवीन पद निर्मिती |
| २ | वृणोपचारक, गट-ड | -- | ०१ | **सदर दोन्ही पदांच्या सेवा बाह्यस्त्रोताद्वारे उपलब्ध करुन घेण्यात याव्यात.** |
| ३ | परिचर,गट-ड | -- | ०१ | |

वृणोपचारक व परिचर (गट-ड) या पदांच्या सेवा बाह्ययंत्रणेद्वारे घेताना वित्त विभागाच्या दि.२७.०९.२०१०, दि.०२.०२.२०१३, दि.०२.१२.२०१३, दि.०२.०८.२०१६ व दि.३०.०९.२०२० च्या शासन परिपत्रकातील मार्गदर्शक सूचनांचे पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी.

जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक यांना उपरोक्त पदांचे वेतन व भत्ते आहरित करण्यासाठी याद्वारे, आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

नविन पदनिर्मीतीच्या तसेच, बाह्यस्त्रोताद्वारे सेवा उपलब्ध करून घेण्याच्या अनुषंगाने वेतन व भत्यावरील खर्च खालील नमुद लेखाशिर्षांतर्गत खर्ची टाकण्यात यावा.

**लेखाशिर्ष**
मागणी क्र.डी-४,
२४०३, पशुसंवर्धन
१०१, पशुवैद्यकीय सेवा व पशुआरोग्य,
(०८), पंचवार्षिक योजनांतर्गत योजना,
(०८) (०१), राज्य योजनांतर्गत योजना-रूग्णालये व दवाखाने (अनिवार्य)
०१, वेतन
३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)
संकेतांक २४०३०२२२

पशुधन विकास अधिकारी, गट-अ चे ०१ नवनिर्मित पद भरण्यासंदर्भात आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी आवश्यक ती कार्यवाही तात्काळ करावी.

हा शासन निर्णय वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र. २७० / २०२१ / व्यय-२ दि.२६.०७.२०२१ यांच्या सहमतीने तसेच, वित्त विभाग पृष्ठांकन क्र.पदनि-२०२१/प्र.क्र.५५/२१/आपुक, दि.२३.०९.२०२१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या मा.उच्च स्तरीय सचिव समितीच्या गुरुवार दि.२६.०८.२०२१ रोजी पार पडलेल्या ६ व्या बैठकीत उक्त नवीन पद निर्मितीस प्रदान करण्यात आलेल्या मान्यतेअन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेताक २०२११०१११७००१५८४०१ आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे,

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

VIKAS TULSHIRAM KADAM

Digitally signed by VIKAS TULSHIRAM KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, pseudonym=DC507174367F67372038B4A3876B5734B8B7FD46, serialNumber=406CB152E109154A7466C0050F88E5A437E17838973824687653A5E8D144B72B, cn=VIKAS TULSHIRAM KADAM
Date: 2021.10.11 17:02:42 +05'30'

**(विकास तु. कदम)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. मा.मंत्री (पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई
२. मा.राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई
३. आयुक्त पशुसंवर्धन, पशुसंवर्धन आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन, नाशिक विभाग
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक
६. प्रधान महालेखापाल (लेखापरिक्षा) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपुर.
७. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपुर.
८. जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, नाशिक.
९. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय , नाशिक.
१०. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक.
११. वित्त विभाग (कार्यासन आपुक) मंत्रालय, मुंबई
१२. कोषागार अधिकारी, नाशिक.
१३. अवर सचिव (पदुम-३) / कक्ष अधिकारी (पदुम-१ व १६), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. निवडनस्ती पदुम-४